**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत कृषि विभागातील सक्षम अधिकाऱ्यांना नाडेप, व्हर्मी कंपोस्टिंग व इतर कामांबाबत मजूरी प्रदान तसेच कामांना तांत्रिक मंजूरी व प्रशासकीय मान्यताविषयक अधिकार प्रदान करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग (रोहयो प्रभाग)**
**शासन निर्णय क्र. : मग्रारो-२०१६ / प्र. क्र. १२०/ मग्रारो-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १४ डिसेंबर, २०१६

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो-२०१० / प्र. क्र. ४७ / रोहयो-१०, दिनांक ८ जून, २०१०
२) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो-२०१० / प्र. क्र.४७ / रोहयो-१०, दिनांक ३ ऑगस्ट,२०११.
३) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो-२०१२ / प्र. क्र. ४ / पुनर्बांधणी -३ / रोहयो-१, दिनांक २७ सप्टेंबर, २०१२
४) शासन परिपत्रक क्र. मग्रारोहयो-२०१२ / प्र. क्र. ३६ / रोहयो-१, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१२
५) शासन पत्र क्र. मग्रारो-२०१२/प्र.क्र.३३/मग्रारो-१, दिनांक १२ मार्च, २०१५
६) केंद्र शासनाचे मास्टर सर्क्यूलर (२०१६-२०१७), दिनांक ०१ एप्रिल, २०१६
७) शासन निर्णय क्र. फळबाग-२०१५, प्र. क्र.२२ / रोहयो-५, दिनांक ०३ सप्टेंबर, २०१६
८) शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१६ / प्र. क्र. १०२ / मग्रारो-१, दिनांक २९ सप्टेंबर, २०१६
९) शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१६ / प्र. क्र. ८५ / मग्रारो-१, दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१६
१०) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. मृद-६ / मगांराग्रारोहयो / विअ /२४४८ / १६, दिनांक २२ सप्टेंबर, २०१६

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामासाठी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्याच्या अधिकाराचे विकेंद्रीकरण करून सदर अधिकार तालुका स्तरावर देण्याच्या अनुषंगाने,संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक ०८ जून, २०१० चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्यानुसार कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार तहसीलदार व गट विकास अधिकारी यांना देण्यात आले आहेत. ग्रामपंचायतीच्या कामांकरिता तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार पंचायत समितीच्या अभियंत्यास देण्यात आले आहेत तसेच, यंत्रणांच्या कामाकरिता तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार संबंधित खात्याचे तालुका पातळीवरील तांत्रिक अधिकाऱ्यास (उदा. अभियंता) देण्यात आले आहेत. मात्र या शासन निर्णयाद्वारे, तांत्रिक मंजूरीच्या अधिकारांचे विकेंद्रीकरण करताना तांत्रिक मंजूरीकरिता आर्थिक मर्यादा दिलेल्या नव्हत्या. त्याचप्रमाणे तहसीलदार व गट विकास अधिकारी यांनाही प्रशासकीय मान्यतेबाबत आर्थिक मर्यादा दिलेल्या नव्हत्या. या बाबी विचारात घेऊन, शासन निर्णय दिनांक ३ ऑगस्ट, २०११ अन्वये, महात्मा गांधी नरेगा अंतर्गत घेण्यात येणाऱ्या सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता (आर्थिक मर्यादेसह) देण्याबाबतचे अधिकार देण्यात आले आहेत.

उपरोक्त संदर्भ क्र. ७ येथील दिनांक ०३ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये कृषि विभागास वैयक्तिक लाभार्थ्यांच्या शेतावर राबविण्यात येणाऱ्या फळबाग लागवड कार्यक्रमांतर्गत कार्यक्रम अधिकारी म्हणून हजेरीपत्रक निर्गमित करणे, भरणे, पारित करणे व कुशल / अकुशल बाबींचे प्रदान करण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. तसेच संदर्भाधीन क्र. ८ येथील दिनांक २९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये वन

विभागामार्फत होणाऱ्या कामांकरिता तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्याचे अधिकार वन विभागातील सक्षम अधिकाऱ्यांना देण्यात आले आहेत.

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत संदर्भ क्र. ४ येथील दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१२ च्या शासन परिपत्रकान्वये अनुज्ञेय केलेल्या कामांनुसार शेततळे, नाडेप कंपोस्टिंग, व्हर्मी कंपोस्टिंग, रोपवाटिका तयार करणे व इतर जलसंधारणाची कामे कृषि विभागामार्फत राबविण्यात येत आहेत. सदर कामे करताना कार्यवाहीचे अनेक टप्पे तहसील कार्यालयामार्फत पार पाडले जातात.

राज्यामध्ये मनरेगाअंतर्गत सन २०१६-१७ व २०१७-१८ या वर्षांमध्ये समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजना राबविण्याबाबत संदर्भ क्र. ९ अन्वये शासन निर्णय दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१६ निर्गमित करण्यात आलेला आहे. त्यानुसार मोठ्या प्रमाणात कामे घेण्याचे प्रस्तावित आहे. महसूल यंत्रणेकडे असलेला कामाचा व्याप पाहता, त्यांचेवर जास्त ताण पडण्याची शक्यता नाकारता येत नाही. संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. १० येथील पत्रान्वये, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वैयक्तिक लाभाची मृद व जलसंधारणाची कामे कृषि विभागामार्फत करण्यासाठी कृषि विभागास तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेचे अधिकार प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. या बाबीचा विचार करुन, कृषि विभागामार्फत करण्यात येणाऱ्या मृद व जलसंधारणाच्या वैयक्तिक कामांच्या अनुषंगाने, त्या यंत्रणेकडे अधिक व्यापक प्रमाणात तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेचे अधिकार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन खालील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

कृषि विभागास वैयक्तिक लाभार्थ्यांच्या शेतावर राबवावयाच्या फळबाग लागवड कार्यक्रमांतर्गत मजूरी प्रदानासंदर्भात दिलेल्या अधिकाराप्रमाणे कृषि विभाग यंत्रणा म्हणून राबविण्यात येत असलेल्या नाडेप कंपोस्टिंग, व्हर्मी कंपोस्टिंग, शेततळे व रोपवाटिकांच्या कामांबाबत हजेरीपत्रक निर्गमित करणे, भरणे, पारित करणे व कुशल / अकुशल बाबींचे प्रदान करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत. शासन निर्णय दिनांक ०३ सप्टेंबर, २०१६ अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे यासंदर्भात कार्यवाही करण्यात यावी.

२. तसेच वर नमूद केल्याप्रमाणे नाडेप कंपोस्टिंग, व्हर्मी कंपोस्टिंग, शेततळे व रोपवाटिकांच्या कामांबाबत खालीलप्रमाणे तांत्रिक व प्रशासकीय मंजूरीचे अधिकार कृषि विभागातील संबंधित अधिकाऱ्यांना प्रदान करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | सक्षम अधिकारी | तांत्रिक मंजूरीची मर्यादा (रूपये लक्ष) | प्रशासकीय मान्यता मर्यादा (रूपये लक्ष) |
|---|---|---|---|
| १. | तालुका कृषि अधिकारी | १०.०० | -- |
| २. | उप विभागीय कृषि अधिकारी | २५.०० | १०.०० |
| ३. | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | ३५.०० | २५.०० |
| ४. | विभागीय कृषि सहसंचालक | ५०.०० | ३५.०० |
| ५. | जिल्हाधिकारी | -- | ५०.०० |
| ६. | संचालक | १००.०० | -- |
| ७. | सचिव (रोजगार हमी योजना) | -- | १००.०० |

३. सदरची कामे घेत असताना लेबर बजेटमध्ये कामे असल्याची खात्री करणे, ग्राम / तालुका / जिल्हास्तरीय मंजूर आराखडयात कामे असणे याकरिता प्रशासकीय मान्यतेपूर्वी पूर्ण कामांच्या यादीला मान्यता देण्याकरिता व शेल्फ तयार करण्याकरिता खालीलप्रमाणे छाननी समिती गठित करण्यात येत आहे:-

**समिती**

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| मुख्य कार्यकारी अधिकारी | सहअध्यक्ष |
| उप वनसंरक्षक | सहअध्यक्ष |
| उपसंचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| सहायक संचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| सहायक वनसंरक्षक | सदस्य |
| उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा / ग्रा.पं.) | सदस्य |
| उपजिल्हाधिकारी (रोहयो) | सदस्य सचिव |

या समितीने सदरची कामे नरेगा लेबर बजेटमध्ये असल्याची खात्री करावी व नंतरच जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या स्वाक्षरीने कृषि विभागाने यादी वापरावी.

४. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत अपूर्ण कामे पूर्ण करण्याकरिता ठेवण्यात आलेल्या पाच अपूर्ण कामांच्या अटीबाबत शासन पत्र दिनांक १२ मार्च,२०१५ अन्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजनेंतर्गत सन २०१६-१७ व २०१७-१८ या वर्षांमध्ये वैयक्तिक व सार्वजनिक लाभाची कामे मोठ्या प्रमाणावर घेण्यात येणार आहेत. त्यामुळे आता नाडेप कंपोस्टिंग, व्हर्मी कंपोस्टिंग व रोपवाटिकांच्या कामांचा अपूर्ण ५ कामांमध्ये समावेश करण्यात येऊ नये.

५. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र अंतर्गत कामाच्या तपासणीचे मापदंड संदर्भाधीन क्र. ३ येथील दिनांक २७ सप्टेंबर, २०१२ अन्वये विहित केलेले आहेत. त्यास अनुसरुन संबंधितांनी कामाची तपासणी करावी.

६. सदर शासन निर्णय दिनांक ३१ मार्च, २०१८ पर्यंत अंमलात राहील. आवश्यकतेनुसार त्यास मुदतवाढ देण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१६१२१३१२४५०२६३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Purushottam N Bhapkar

Digitally signed by Purushottam N Bhapkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9878980bd80d5b35fe3e1f682b8222bb14a9c71cd698e9baa37a653df532555, cn=Purushottam N Bhapkar
Date: 2016.12.23 16:43:36 +05'30'

**( डॉ.पुरुषोत्तम भापकर )**
**सचिव (रोहयो)**

**प्रत**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त
९. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर
१०. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
११. सर्व जिल्हाधिकारी
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१६. प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर
१८. सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक
१९. सर्व मुख्य वनसंरक्षक
२०. सर्व उपवनसंरक्षक
२१. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२२. सर्व जिल्हाअधीक्षक कृषि अधिकारी
२३. सर्व उपविभागीय कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी
२४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
२५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
२६. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, नियोजन (रोहयो) / वन विभाग
२७. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
२८. निवड नस्ती (मग्रारो-१).